माणिकगड किल्ला, माणिकगड, ता.जिवती, जि.चंद्रपूर (भाग-१) या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन व दुरुस्ती कामाच्या द्वितीय देयकास वित्तीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : स्मारक-२०२३/प्र.क्र.२२२/सां.का.३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २७ फेब्रुवारी, २०२५

**वाचा :-** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. स्मारक-२०२३/ प्र.क्र.२२२/सां.का.३, दि.१४.०८.२०२३.
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. स्मारक-२०२३/ प्र.क्र.२०४/सां.का.३, दि.२३.११.२०२३.
३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. स्मारक-२०२३/ प्र.क्र.२२२/सां.का.३, दि.३१.०३.२०२४.
४) संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांचे जा.क्र.स्मारके/२०२४/२७०२, दिनांक ०५.०९.२०२४ रोजीचे पत्र .

**प्रस्तावना :-**

माणिकगड किल्ला, ता.जिवती, जि.चंद्रपूर या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन दुरुस्ती कामाच्या रु.१३,६७,२४,६२४/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास उपर्निर्दिष्ट क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार या कामाकरीता निविदा प्रक्रिया राबविण्यात आली त्यातील मे.एन.जे.काकडे, नागपूर यांच्या न्यूनतम निविदा प्रस्तावास व वाढीव निविदेमुळे रु.१४,२५,०४,३४२/- इतक्या रकमेस सुधारीत प्रशासकीय मान्यता उपर्निर्दिष्ट क्र.२ येथील शासन निर्णयान्वये देण्यात आली आहे. त्यानुसार सदर कामाकरीता रु.१,४५,५४,६४७/- इतक्या रकमेच्या प्रथम देयकास उपर्निर्दिष्ट क्र.३ येथील शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात आली आहे.

आता सदर स्मारकाचे काम प्रगतिपथावर असून या स्मारकाच्या जतन दुरुस्ती कामाचे रु.१,५०,००,०००/- इतक्या रकमेच्या दुसऱ्या देयकास वित्तीय मान्यता देण्याची विनंती संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी उपर्निर्दिष्ट क्र.४ च्या पत्रान्वये केली आहे. त्यानुसार सदर प्रयोजनार्थ जतन व दुरुस्ती कामाच्या दुसऱ्या देयकास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

माणिकगड किल्ला, ता.जिवती, जि.चंद्रपूर या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन व दुरुस्ती कामासाठी येणाऱ्या रु.१,५०,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी पन्नास लक्ष मात्र) इतक्या रकमेच्या द्वितीय देयकास या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधिच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर काम हे पुरातत्वीय निकषानुसार/मानकानुसार पूर्ण करण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय व संबंधित संवर्धन वास्तुविशारद यांची असेल.

३. हा शासन निर्णय विअप्र-२०१३/प्र.क्र.२०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७(२) "अ" नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णयास नियोजन विभाग अनौ.सं.क्र.४१/का-१४४३, दि. २४ जानेवारी, २०२५ अन्वये व वित्त विभाग अनौ.सं.क्र.११८.२०२५/व्यय-१५, दि. १४ फेब्रुवारी, २०२५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

४. यासाठी होणारा खर्च पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग मागणी क्र. झेडडी-२ २२०५, कला व संस्कृति, (००) (१०३) पुरातत्वशास्त्र, (०१) (०६) राज्यातील ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या महत्वाचे किल्ले व धार्मिक स्थळे यांची जपणूक व संरक्षण (कार्यक्रम) (२२०५ १३०२) २७-लहान बांधकामे या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/ अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४ व १२ फेब्रुवारी, २०२५ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांची राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०२२७१२४०४०१८२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D931702558094468 5E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2025.02.27 12:41:34 +05'30'

( नंदा राऊत )

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. उपसचिव (सां.का.३), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. सहाय्यक संचालक, पुरातत्व विभाग, नाशिक.

६. महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. महालेखापाल -२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती, सां.का.३.